महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, औरंगाबाद मौजे कांचनवाडी येथील विविध कामास सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात पुनर्विनियोजनाने उपलब्ध झालेला निधी वितरीत करण्याबाबत...

महाराष्ट्र शासन
उच्च व तंत्र शिक्षण विभाग
**शासन निर्णय क्र. एनएलयु-२०१९/प्र.क्र.८६/विशि-२**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २८ मार्च, २०२३.

**<u>संदर्भ</u> :-** (१) शासन निर्णय समक्रमांक दि.२३.०८.२०१९.
(२) शासन निर्णय समक्रमांक दि.१४.०१.२०२१.
(३) शासन निर्णय समक्रमांक दि.०८.०७.२०२२.
(४) शासन निर्णय समक्रमांक दि.१८.१०.२०२२, दि.०१.१२.२०२२ व दि.२१.०२.२०२३
(५) कुलगुरु, महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, औरंगाबाद यांचे दि.२८.०२.२०२३ रोजीचे पत्र.
(६) पुनर्विनियोजन शासन निर्णय क्र.पुनर्वि-२०२३/प्र.क्र.३३/विशि-२, दि.२८.०३.२०२३.

**<u>प्रस्तावना :-</u>**

महाराष्ट्र राज्यात मुंबई, नागपूर व औरंगाबाद येथे विधी विद्यापीठाची स्थापना करण्यास मंत्रीमंडळाने मान्यता दिली आहे. सदर मान्यतेनुसार महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, औरंगाबाद येथे मौजे कांचनवाडी परिसरात विविध इमारतींचे बांधकामासाठी रु.१४९.७२ कोटी शासनाकडून टप्प्या-टप्पाने उपलब्ध करून देण्यास संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. तसेच सदर बांधकामात Centre of Excellence या इमारतीचा समावेश करण्यास संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. दरम्यान या बांधकामात विद्यापीठाने सुधारणा प्रस्तावित केली होती. त्यास अनुलक्षुन दि.२३.०८.२०१९ व दि.१४.०१.२०२१ रोजीचे शासन निर्णय दि.०८.०७.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये अधिक्रमित करण्यास मान्यता देण्यात आली असून, नव्याने महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ औरंगाबाद करिता मौजे कांचनवाडी परिसरातील विविध बांधकामासाठी रु.१,४९,७२,१८,२२२/- (अक्षरी एकशे एकोणपन्नास कोटी बाहत्तर लक्ष अठरा हजार दोनशे बावीस फक्त) इतक्या रक्कमेच्या अंदाजपत्रकास (Recapitulation Sheet) मान्यता देण्यात आली आहे.

सदर बांधकामातील बाह्य पाणी पुरवठा व मल व जलनिस्सारणाचे कामे व फर्नीचर पुरवठा करणे हे कामे पुर्ण करण्यासाठी निधी वितरीत करण्याची संदर्भ क्र.५ येथील पत्रान्वये विनंती केली आहे. सदर कामास पुनर्विनियोजनाद्वारे निधी वितरीत करण्यास वित्त विभागाने सहमती दिली आहे. तद्नुषंगाने या कामाकरीता पुनर्विनियोजनाद्वारे निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राष्ट्रीय वधीवद्यािपीठ, औरंगाबाद यांना मौजे कांचनवाडी बाह्य पाणी पुरवठा व मल व जलनिस्सारणाचे कामे व फर्नीचर पुरवठा करणे हे कामे पुर्ण करण्यासाठी सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध झालेल्या निधीतून रु.१,९४,९२,६०९/- (अक्षरी रुपये एक कोटी चौऱ्याण्णव लक्ष ब्याण्णव हजार सहाशे नऊ फक्त) इतका निधी खालील अटींच्या अधीन राहून मंजूर करण्यात येत आहे.

(१) महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ अधिनियम २०१४ नुसार शासनाकडून मंजूर झालेले अनुदान हे विद्यापीठ निधीत जमा करुन अनुदानाचे व्यवस्थापन करण्याची जबाबदारी कार्यकारी परिषदेची असेल. तसेच सदर अनुदानातून करण्यात आलेल्या खर्चाचे विनिमय करुन खर्चाच्या लेख्यांचे विवरणपत्र महापरिषदेपुढे ठेवून त्यास मान्यता घेण्याची कार्यवाही विद्यापीठाने करावी.

(२) कुलगुरु, महाराष्ट्र राष्टीय विधी विद्यापीठ, औरंगाबाद यांना शासनाकडून ज्या प्रयोजनार्थ अनुदान मंजूर करण्यात आलेले आहे, हे अनुदान त्याच प्रयोजनार्थ खर्च करण्यात आले आहे, हे पाहण्याची जबाबदारी कुलगुरु यांची असेल. यासंदर्भात त्यांनी कार्यकारी परिषदेची मान्यता घेऊन त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र उच्च शिक्षण संचालनालयामार्फत शासनास सादर करावे.

(३) वरील सर्व अनुदानाची सर्व कागदपत्रे व हिशेब महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई किंवा प्रकरणपरत्वे महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर यांनी सदर कामाकरिता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे अधिकार असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्व कागदपत्रे त्यांचेकडे तपासणीकरिता विधी विद्यापीठाने सादर केली पाहिजेत.

(४) विद्यापीठास ज्या उद्दिष्टासाठी अनुदान मंजूर केलेले आहे त्याच उद्दिष्टासाठी मंजूर केलेल्या अनुदानाचा वापर करावा.

(५) यासंदर्भात वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेतील तरतुदी व अटीचे ततोतंत पालन करावे. तसेच शासनाच्या प्रचलित नियम व अटी, शर्ती विचारात घेऊन कार्यवाही करण्यात यावी.

२. सदरहू मंजूर झालेली तरतुद महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, औरंगाबाद यांना तातडीने सुपूर्द करण्याची सर्वस्वी जबाबदारी संचालक (उच्च शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांची राहील. तसेच वरील अनुदानाची सर्व कागदपत्रे व हिशेब महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई किंवा प्रकरणपरत्वे महालेखापाल-२, नागपूर यांनी सदर कामाकरीता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे अधिकार असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्व कागदपत्रे त्यांच्याकडे तपासणीकरीता विद्यापीठाने सादर केली पाहिजेत. विद्यापीठास ज्या उद्दिष्टासाठी मंजुर केलेल्या अनुदानाचा वापर त्याच उद्दिष्टासाठी करावा. तसेच विहीत कालावधीमध्ये सदरचा खर्च पूर्णपणे करण्यात येईल याची दक्षता घेण्यात यावी आणि त्याबाबतचे विनियोग प्रमाणपत्र (Utilization Certificate) संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांचेमार्फत शासनास विहित वेळेत सादर करण्यात यावे.

३. सदर खर्च "मागणी क्रमांक - डब्ल्यु-२, प्रधानशिर्ष- २२०२- सर्वसाधारण शिक्षण, ०३- विद्यापीठीय व उच्च शिक्षण, १०२- विद्यापीठांना सहाय्य, - (००) (२१) विधी विद्यापीठाचा विकास (२२०२ जी ९५९), ३१ सहाय्यक अनुदाने" या लेखाशिर्षाखाली सन २०२२-२०२३ मधील मंजूर तरतुदीतून खर्ची टाकण्यात यावा.

४. हा शासन निर्णय, महाराष्ट्र विनियोजन अधिनियम २०२२, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.०४.०४.२०२२ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे. या शासन निर्णयातील परिशिष्ट मधील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३३०१३४०२२६२०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

AJIT MADHUKARRAO BAWISKAR

Digitally signed by AJIT MADHUKARRAO BAWISKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=deb455609479b6c7f30e7f1f9a8360c0f8600a542859e8fe229d6ea333415e8d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=99EB928028DF71EBDFCD2898E209D499192AD3899261FEAD42F7D38A3141AB69, cn=AJIT MADHUKARRAO BAWISKAR
Date: 2023.03.30 13:46:56 +05'30'

**(अ. म. बाविस्कर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे. (५ प्रती).
३. कुलगुरु, महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, औरंगाबाद.
४. कुलसचिव, महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, औरंगाबाद.
५. सहसंचालक (उच्च शिक्षण), औरंगाबाद विभाग, औरंगाबाद.
६. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
७. महालेखापाल, (लेखा परीक्षण) -२, महाराष्ट्र, नागपूर.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/ औरंगाबाद.
९. कार्यासन अधिकारी (का-१४७१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.वित्त विभाग,(व्यय-५) (अर्थसंकल्प-३/८) मंत्रालय, मुंबई.
११.प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१२.उप सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१३.अवर सचिव (साशि-१), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
१४.निवड नस्ती (विशि-२), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.